


# साहित्य समीक्षा परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

# साहित्य समीक्षा परिभाषा कोश
# उपसमिती

अध्यक्ष

प्रा. वा. ल. कुलकर्णी, मुंबई विद्यापीठ, मुंबई

प्रतिनिधि—सदस्य

डॉ. रा. भा. पाटणकर, मुंबई विद्यापीठ, मुंबई
प्रा. श्री. पु. भागवत, मुंबई विद्यापीठ, मुंबई
डॉ. भा. दि. फडके, पुणे विद्यापीठ, पुणे
डॉ. द. भि. कुलकर्णी, नागपूर विद्यापीठ, नागपूर
डॉ. नि. जि. फडकुले, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
प्रा. भगवंत देशमुख, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
डॉ. यू. म. पठाण, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
डॉ. स. गं. मालशे, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई
प्रा. रा. भि. जोशी, मराठी विज्ञान परिषद, मुंबई
प्रा. मं. वि. राजाध्यक्ष

सदस्य—सचिव

श्री. य. शं. कानिटकर, भाषा संचालक
(डिसेंबर १९७५ ते एप्रिल १९८१)

# प्रस्तावना

मातृभाषा शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या. मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकवण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्य-पुस्तके व संदर्भपुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्यापीठांतून समान व एकसम परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखां-मधील काही मूलभूत विषयांच्या समित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या समित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवावे लागले. त्यामुळे ही परिभाषा मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी शक्यतो मिळतीजुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिक, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीरक्रियाशास्त्र व जीवशास्त्र, वाणिज्यशास्त्र (सुधारित), राज्यशास्त्र या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच अर्थशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल, भाषाशास्त्र, संख्याशास्त्र व गणितशास्त्र (सुधारित), रसायनशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, मानसशास्त्र, विकृतिशास्त्र, ग्रंथालयशास्त्र (सुधारित) या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण झाले असून तेही कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत साहित्य समीक्षा परिभाषा कोश हा या प्रकल्पातील एक भाग आहे.

साहित्य समीक्षा परिभाषा निर्मितीचे काम एक समिती नेमून पूर्ण करण्यात आले आहे. समितीच्या एकूण ७० बैठकी घेण्यात आल्या व सुमारे २,००० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले. हा परिभाषा कोश तयार करताना समितीने या विषयांतील विद्यापीठीय स्तरावरील पारिभाषिक संज्ञा विचारात घेतल्या तसेच संदर्भादाखल केंद्र सरकारने तयार केलेल्या शब्दसंग्रहाचाही वापर केला.

अनेक मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच, या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

दिनांक ३० मार्च, १९८७
भाषा संचालनालय,
मुंबई ४०० ०३२

**न. ब. पाटील**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्रक्षेत्रांत यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्याचा समन्वय करण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करताना देखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावलींचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकांतून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत ते देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—"आंतरराष्ट्रीय संज्ञा" या शक्यतोवर त्यांच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणत: पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे वगैरेसह) यांची नावे; ही नावे लिप्यंतरित करून देताना नावापुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत. जसे :—

हायड्रोजन (H), कार्बन (C)

मात्र मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जशीच्या तशीच ठेवावीत. जसे :—

किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय $90th^{228}$, निकोटीन $C_{10}\ H_{14}\ N_2$

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून, पुढीलप्रमाणे द्यावीत :—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| सोडियम बायसल्फेट | + | सोडियम क्लोराईड | = | सोडियम सल्फेट | + | हायड्रोक्लोरिक ॲसिड |

$$NaHSO_4 + NaCl = Na_2\ SO_4 + HCl$$

गंधक, रुपे, तांबे, कथिल, पारा, जस्त, शिसे इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत; परंतु संयुगांमध्ये मात्र त्यांचा वापर करू नये.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे, जसे :—कॅलरी, ॲम्पीअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात. जसे :—फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), ॲम्पीअर (ॲम्पीअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूविज्ञान इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे जसे :—Sin, Cos, Tan, Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत. जसे :—ऑक्सिजन–प्राणवायु, कॅलरी–ऊष्मांक, Sin–ज्या, Cos–कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. म्हणजे सेंटिमीटर या संज्ञेचा संक्षेप सें.मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावे.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारण वापरण्यात येणारे पर्याय राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत. जसे :—मशीन, इंजिन, मीटर, लिटर वगैरे.

७. मिश्र शब्दांची निर्मिती.—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation—"पाश्चरीकरण", Voltage—"व्होल्टता" अशांसारखे मिश्र-शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

८. जरूर तेथे समानार्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

## कोश परिचय

कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे.

**इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम.**—Joseph T. Shipley यांच्या Dictionary of World Literarary Terms या कोशाचा इंग्रजी पारिभाषिक संज्ञा व त्यांचा अर्थ यांसाठी आणि Webster's New International Dictionary या कोशाचा वर्णलेखन (Spelling), इंग्रजी व्याकरण इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

**इंग्रजी शब्दजाती.**—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शवली आहे. (जसे *n.*, *adj.*, *v. t.*, *v. i.* इ.) इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवलेली नाही.

**विषयनिर्देशक संक्षेप.**—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शवणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरांत दिला आहे.

**पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना दोन वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायांपूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे.

**मराठी शब्दजाती.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शवली नाही.

**लिंगनिर्देश.**—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. (जसे (पु.), (स्त्री.), (न.), इ.) (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायांपुढे लिंगनिर्देश केला आहे.

**शब्दकुळे.**—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवतात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द त्यांच्या वर्णानुक्रमानुसार कोशात योग्य त्या ठिकाणी सुद्धा दिले आहेत व तेथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कुळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृ. १ वरील 'abridgment' हे कुळ पहावे. अशातऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा.**—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञेतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शवणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृ. १० वरील 'comedy' ही संज्ञा. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**समानार्थी शब्द.**—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना, त्यातील एका शब्दासमोर तो वर्णानुक्रमाने ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी पर्याय दिला आहे व दुसरा इंग्रजी समानार्थी शब्द कंसांत also असे म्हणून दिला आहे. उदा. पृष्ठ १० वरील comedy of wit (*also* comedy of manners) इत्यादी.

साहित्य समीक्षा परिभाषा कोशाच्या इंग्रजी – मराठी कोशाबरोबरच मराठी – इंग्रजी कोश देखील मुद्रित केलेला आहे. या कोशाची रचना मराठी पर्याय व तो ज्या इंग्रजी संज्ञेचा पर्याय म्हणून दिलेला आहे ती इंग्रजी संज्ञा याप्रमाणे आहे.

मराठीचा वर्णानुक्रम लावताना—

(१) अनुस्वारयुक्त शब्दांचा क्रम त्या वर्णावर जणु अनुस्वार नाही असे समजून लावण्यात आला आहे.

(२) क्ष व ज्ञ हे वर्ण स्वतंत्र न मानता अनुक्रमे क् + श तसेच द् + न् + ञ् याप्रमाणे जोडाक्षरे समजून त्यांचा क्रम लावला आहे.

# संक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| *adj.* | .. | Adjective |
| *cf.* | .. | Compare |
| *n.* | .. | Noun |
| *pfx.* | .. | Prefix |
| *pl.* | .. | Plural |
| *Rh.* | .. | Rhetoric |
| *sing.* | .. | Singular |
| *usu.* | .. | Usually |
| *v.i.* | .. | Verb, intransitive |
| *v.t.* | .. | Verb, transitive |
| *v.t. & i.* | .. | Verb, transitive and intransitive |
| अ. | .. | अव्यय |
| अ.व. | .. | अनेकवचन |
| क्रिया. | .. | क्रियापद |
| क्रि.वि. | .. | क्रियाविशेषण |
| न. | .. | नपुंसकलिंग |
| पु. | .. | पुल्लिंग |
| विशे. | .. | विशेषण |
| श.अ. | .. | शब्दयोगी अव्यय |
| सा. | .. | सामान्य लिंग |
| स्त्री. | .. | स्त्रीलिंग |

# साहित्य समीक्षा परिभाषा कोश

(इंग्रजी-मराठी)

## A

**abbreviation,** *n.* **संक्षेप** (पु.)
**abnormal,** *adj.* १ अपसामान्य २ अस्वाभाविक
**abridgment,** *n.* (*also* abridgement) **संक्षेपण** (न.)
*cf.* abstract, गोषवारा
argument, कथानकसार
compendium, ग्रंथसार, ग्रंथसंक्षेप
digest, १ सारसंग्रह २ सार
epitome, १ सार २ साररूप
precis, संक्षेप
resume, सारांश
summary = synopsis सार, सारांश
**absolute,** *n.* *Aesthetics* १ **विश्वचैतन्य** (न.) २ **केवल** (न.)
**absolute,** *adj.* **केवल**
**absolute beauty, केवल सौंदर्य** (न.) (*see* beauty)
**absolute idealism, केवलचिद्वाद** (पु.), **विश्वचैतन्यवाद** (पु.)
**absolute idealist, केवलचिद्वादी** (पु.), **विश्वचैतन्यवादी** (पु.)
**absolute value, केवलमूल्य** (न.) (*see* value)
**absolutism,** *n.* **केवलवाद** (पु.)
**absolutist criticism, केवलमूल्यनिष्ठ समीक्षा** (*see* criticism)
**abstract,** *adj.* १ **अमूर्त** २ **अप्रतिरूप**
*n.* **गोषवारा** (पु.) *cf.* abridgment
**abstract art,** १ **अमूर्त कला** २ **अप्रतिरूप कला** (*see* art)
**abstract expression, अमूर्त आविष्कार, अप्रतिरूप आविष्कार**
**abstract expressionism,** १ **अमूर्त आविष्कारवाद** २ **अप्रतिरूप आविष्कारवाद**
**abstract image, अमूर्त प्रतिमा** (*see* image)
**abstraction,** *n.* **अमूर्तीकरण** (न.)
**abstractionism,** *n.* **अमूर्तीकरणवाद** (पु.)
**abstract poem, अप्रतिरूप कविता** (*see* poem)
**abstract quality, अमूर्त गुण**
**abstract setting, अप्रतिरूप पार्श्वभूमी, अप्रतिरूप नेपथ्य**
**abstract style, अप्रतिरूप शैली** (चित्रकला)
**abstract term, गुणवाचक पद, भाववाचक पद**
**abstract treatment,** १ **अमूर्त मांडणी** २ **अप्रतिरूप मांडणी**
**abstruse,** *adj.* **दुर्बोध**
**abuse,** *n.* **अपप्रयोग** (पु.)
**abusive song, शालिगीत** (न.)
**academic,** *adj.* १ **पंडिती** २ **विद्याविषयक**
**academic convention, पंडिती संकेत** (*see* convention)
**academic drama, विद्यापीठीय रंगभूमी** (*see* drama)
**academic poet, पंडित कवी**
**accent,** *n.* (*also* stress) १ **आघात** (पु.) २ **भार** (पु.)
**accentual verse system, आघातनिष्ठ छंदोरचना**
**accumulative tale, परिवर्धी कथा** (*see* tale)
**acknowledgment,** *n.* (*also* acknowledgement) **ऋणनिर्देश** (पु.)
*cf.* contents, अनुक्रम, विषयानुक्रमणिका, अनुक्रमणिका
credit, श्रेयनिर्देश
epilogue, उपसंहार
foreword = preface, प्रास्ताविक

index, सूची
introduction, १ उपोद्घात २ विषय-प्रवेश ३ प्रस्तावना
prologue, उपन्यास
**acoustics,** *n.* **ध्वनिविज्ञान** (न.)
**acquired response, उपार्जित प्रतिसाद**
**acronym,** *n.* **आद्याक्षरबंध** (पु.)
**acrostic,** *n.* **विशिष्टाक्षरबंध** (पु.)
**act,** *n.* **अंक** (पु.) (नाटकाचा)
*v.t. & i.* अभिनय करणे
**actable,** *adj.* **अभिनेय**
**act curtain,** (*also* **act drop**) **अंकाचा पडदा**
**act-division** *n.* **अंकविभाजन** (न.)
**act drop,** (*also* **act curtain**) **अंकाचा पडदा**
**acting,** *n.* **अभिनय** (पु.)
**acting drama, अभिनेय नाटक** (*see* drama)
**acting edition,** (*also* **stage version**) **रंगावृत्ती** (स्त्री.)
**acting time, नाट्यप्रयोगकाल** (पु.)
**act intermission=act interval मध्यंतर** (न.), **मध्यांतर** (न.)
**action,** *n.* **कृती** (स्त्री.)
falling action, अवरोही कृती
rising action, आरोही कृती
symbolic action, प्रतीकात्मक कृती
**action–song,** *n.* **अभिनयगीत** (न.) (*see* song)
**active vocabulary, जिवंत शब्द, प्रचलित शब्दसंग्रह**
**actor,** *n.* **अभिनेता** (पु.), **नट** (पु.)
**actress,** *n.* **अभिनेत्री** (स्त्री.), **नटी** (स्त्री.)
**actuality,** *n.* **प्रत्यक्षता** (स्त्री.)
**acyrolog** *n.* (*also* **acyrologia** *or* **acyrology**) **अतिसौम्योक्ती** (स्त्री.)
**adage,** *n.* **म्हण** (स्त्री.)
**adaptation,** *n.* **१ रूपांतर** (न.) **२ अनुवाद** (पु.)
*cf.* paraphrase, अर्थानुवाद
rendering, अनुवाद
translation, भाषांतर
**addendum,** *n.* (*pl.* addenda) (*also* **supplement**) **पुरवणी** (स्त्री.)
*cf.* annexure, जोडपत्र
appendix, परिशिष्ट
supplement, पुरवणी
table, १ तक्ता, सारणी २ कोष्टक
**address,** *n.* **अभिभाषण** (न.)
**adoration,** *n.* **उपासनासंगीत** (न.) (खिस्ती)
**adornment,** *n.* **अलंकरण** (न.)
**adumbration,** *n.* **१ पूर्वसूचन** (न.) **२ रूपरेखाचित्रण** (न.)
**adventure novel, साहस-कादंबरी** (स्त्री.) (*see* novel)
**adventure story, साहसकथा** (स्त्री.) (*see* story)
**aesthete,** *n.* **१ रसज्ञ** (पु.) **२ रसिकमन्य** (पु.)
**aesthetic,** *adj.* (esthetic) **१ सौंदर्यशास्त्रीय २ कलावादी**
**aesthetic attitude, सौंदर्यवृत्ती** (स्त्री.), **सौंदर्यदृष्टी** (स्त्री.), **सौंदर्यात्मक वृत्ती, कलात्मक वृत्ती, सौंदर्यात्मक दृष्टिकोन, कलात्मक दृष्टिकोन**
**aesthetic distance,** (*also* **psychic distance**) **कलात्मक ताटस्थ्य, कलात्मक अंतर**
**aesthetic emotion, सौंदर्यभावना** (स्त्री.)
**aesthetic evaluation, कलात्मक मूल्यमापन**
**aesthetic experience, १ सौंदर्यानुभव** (पु.) **२ रसानुभव** (पु.)
**aesthetic hedonism, सुखवादी सौंदर्यसिद्धांत**
**aestheticism,** *n.* (*also* **estheticism**) **कलावाद** (पु.), **सौंदर्यवाद** (पु.)
**aesthetic judgement, सौंदर्यविधान** (न.), **सौंदर्यवाचक विधान** (*see* judgement)
**aesthetic mode, कलात्मक पद्धती**
**aesthetic moment, रसप्रतीतिक्षण** (पु.), **सौंदर्यप्रतीतिक्षण** (पु.)
**aesthetic movement, कलावादी पंथ, सौंदर्यवादी पंथ, कलावादी संप्रदाय, सौंदर्यवादी संप्रदाय**

**aesthetics,** *n.* (*also* esthetics) १ **सौंदर्यशास्त्र** (न.) २ **सौंदर्यमीमांसा** (स्त्री.)
**aesthetic sense, सौंदर्यदृष्टी** (स्त्री.)
**aesthetic senses, सौंदर्येंद्रिये** (न. अ. व.)
**aesthetic sense theory, सौंदर्येंद्रिय सिद्धांत**
**aesthetic value, सौंदर्यमूल्य** (न.), **कलामूल्य** (न.) (*see* value)
**affect,** *n.* **भावभार** (पु.)
**affective association, भाव-साहचर्य** (न.)
**affective experience, भावनात्मक अनुभव**
**affective fallacy, परिणामनिष्ठ हेत्वाभास** (*see* fallacy)
**age,** *n.* **युग** (न.)
**agnosticism,** *n.* **अज्ञेयवाद** (पु.)
**agreeable,** *adj.* **हृद्य** (काण्ट)
*cf.* beautiful, सुंदर
charming, मोहक
elegant, १ सुभग २ डौलदार
graceful, चारु, ललित, लालित्यपूर्ण
grotesque, विरूप
ugly, कुरूप, विद्रूप
**agreement and difference, साधर्म्य-वैधर्म्य** (न.), **साम्यभेद** (पु.)
**alienation,** *n.* १ **दूरीभवन** (न.) २ **दूरीकरण** (न.), **वियुक्तीकरण** (न.)
**allegorical,** *adj.* **रूपकात्मक**
**allegorical novel, रूपकात्मक कादंबरी** (*see* novel)
**allegory,** *n.* १ **रूपककथा** (स्त्री.) २ **रूपक** (न.)
*cf.* apologue = fable दृष्टांतकथा, नीतिकथा, प्राणिकथा
legend, आख्यायिका, दंतकथा
myth, आदिमकथा, पुराणकथा, मिथ
parable, तात्पर्यकथा
**alliteration,** *n.* **अनुप्रास** (पु.)
**allonym,** *n.* **छद्मनाम** (न.)
**allusion,** *n.* १ **श्रुतयोजन** (न.) २ **निर्देश** (पु.)

**allusive,** *adj.* १ **श्रुतयोजनयुक्त** २ **निर्देशयुक्त**
**a-logical,** *adj.* **तर्कनिरपेक्ष**
*cf.* illogical, तर्कदुष्ट
logical तर्कशुद्ध, तर्कनिष्ठ
**altar poem,** (*also* carmen figuratum *or* pattern poem) **चित्रकाव्य** (न.)
**alter ego, अपरस्व** (पु.)
**alternate rhyme, एकांतर यमक**
**alternate, title, वैकल्पिक शीर्षक, पर्यायी शीर्षक, वैकल्पिक मथळा, पर्यायी मथळा**
**amateurish,** *adj.* **अपरिपक्व, शिकाऊ**
**amateur theatre, हौशी रंगभूमी** (*see* theatre)
**ambage,** *n.* **सहेतुक पाल्हाळ** (पु.)
**ambiguity,** *n.* १ **अनेकार्थता** (स्त्री.) २ **संदिग्धता** (स्त्री.)
**ambivalence,** *n.* **द्विधाभाव** (पु.)
**amoral,** *adj.* **नीतिनिरपेक्ष**
**amoralism,** *n.* **नीतिनिरपेक्षतावाद** (पु.)
**amphi-theatre,** *n.* **अँफि थिएटर** (न.), **परिप्रेक्षागृह** (न.)
**anachronism,** *n.* **कालविपर्यास** (पु.)
**anagnorisis,** *n.* (*also* discovery, recognition) **अभिज्ञान** (न.) (शोकात्मिका) *cf.* climax
**anagram,** *n.* **वर्णविपर्याससाधित शब्द** (पु.)
**analects,** *n. pl.* **सूक्तिसंग्रह** (पु.)
**analogia,** *n. Rh.* **प्रमाणबद्धता** (स्त्री.)
**analogy,** *n.* **सादृश्य** (न.)
**analysis,** *n.* **पृथक्करण** (न.), **विश्लेषण** (न.)
content analysis, १ आशय-विश्लेषण २ विषयविश्लेषण
structural analysis, संरचना-विश्लेषण
verbal analysis, भाषिक विश्लेषण
**analytic,** *adj.* **विश्लेषणात्मक**
**analytical criticism, विश्लेषणात्मक समीक्षा** (*see* criticism)
**analytical definition, विश्लेषणात्मक व्याख्या** (*see* definition)
**ancient,** *adj.* **प्राचीन**

*cf.* contemporary, समकालीन
medieval, मध्ययुगीन
modern, आधुनिक, अर्वाचीन
new, नव–

**anecdote,** *n.* **आख्यायिका** (स्त्री.), **किस्सा** (पु.)
**animal tale, प्राणिकथा** (स्त्री.) (*see* tale)
**animation,** *n.* **चेतनीकरण** (न.)
**animism,** *n.* **चेतनवाद** (पु.)
**annals,** *n. pl.* (*also* **chronicle**) **बखर** (स्त्री.), **तवारिख** (स्त्री.)
*cf.* diary, दैनंदिनी, रोजनिशी
journal १–पत्रिका, ज्ञानपत्रिका
२ दैनंदिनी
year book, वार्षिक, सांवत्सरिक

**annexure,** *n.* **जोडपत्र** (न.) *cf.* addendum
**annotate,** *v.t.* **टिपा लिहिणे**
**annotated bibliography, सटीप संदर्भग्रंथसूची**
**annotated edition, सटीप आवृत्ती** (*see* edition)
**annotations,** *n. pl.* **टिपा** (स्त्री. अ. व.)
**annual,** *n.* **वार्षिक** (न.)
**anonymous,** *adj.* **निनावी**
**antagonist,** *n.* **प्रतिद्वंद्वी** (पु.), **प्रतिनायक** (पु.)
**antecedent,** *adj.* **पूर्ववर्ती**
**anthology,** *n.* **प्रातिनिधिक संग्रह** (पु.), **वेचे** (पु.अ.व.)
**anthropological school, मानवशास्त्रीय संप्रदाय**
**anthropomorphic term, मनुष्यत्वारोपी संज्ञा**
**anthropomorphism,** *n.* **मनुष्यत्वारोप** (पु.)
**anthropopathia,** *n.* **मानवीकरण** (न.)
**anticlimax,** *n.* (*also* **catabasis**) **अकल्पित अवकर्ष** (पु.) (शोकात्मिका) *cf.* climax
**anti-hero,** *n.* **न-नायक** (पु.)
**anti-intellectualism,** *n.* (*also* **anti-rationalism**) **प्रतितार्किकतावाद** (पु.)
**anti-moralism,** *n.* **प्रति-नीतिवाद** (पु.)
**anti-novel,** *n.* **न-कादंबरी** (स्त्री.) (*see* novel)
**antiphrasis,** *n.* **व्याजस्तुती** (स्त्री.)
**anti-play,** *n.* **न-नाटक** (न.) (*see* play)

**antiquarianism,** *n.* **पुरातत्त्ववाद** (पु.)
**antiquities,** *n. pl.* १ **पुरातन वस्तू** (स्त्री.अ.व.) २ **पुरावशेष** (स्त्री.अ.व.)
**anti-rationalism,** *n.* (*also* **anti-intellectualism**) **प्रतितार्किकतावाद** (पु.)
**antithesis,** *n.* **प्रतिपक्ष** (पु.)
*cf.* synthesis, समन्वयपक्ष
thesis, पक्ष

**antonym,** *n.* **विरुद्धार्थी शब्द** (पु.)
**aphorism,** *n.* (*also* **sententia**) **सूत्र** (न.)
**aphoristic style, सूत्ररूप शैली** (*see* style)
**apocrypha,** *n.* **संदिग्धप्रमाण रचना** (स्त्री.), **शंकास्पद वाङ्मय** (न.)
**apologia,** *n.* (*also* **apology**) **मंडनिका** (स्त्री.), **कैफियत** (स्त्री.)
**apologue,** *n.* (*also* **fable**) **दृष्टांतकथा** (स्त्री.), **नीतिकथा** (स्त्री.), **प्राणिकथा** (स्त्री.) *cf.* allegory
**apology,** *n.* (*also* **apologia**) **मंडनिका** (स्त्री.) **कैफियत** (स्त्री.)
**apophthegm,** *n.* (*also* **maxim**) **बोधवचन** (न.)
**apostrophe,** *n.* १ **विषयांतरित आवाहन** (न.) २ **संबोधन** (न.)
**apotheosis,** *n.* **दैवतीकरण** (न.)
**appendix,** *n.* **परिशिष्ट** (न.) *cf.* addendum
**application,** *n.* **उपयोजन** (न.)
**applied criticism,** १ **उपयोजित समीक्षा** २ **उपपत्तिनिष्ठ समीक्षा** (*see* criticism)
**applied linguistics, उपयोजित भाषाविज्ञान**
**apposition,** *n.* **समानाधिकरण** (न.)
**appraisal,** *n.* (*also* **appraisement**) **मूल्यमापन** (न.)
**appreciation,** *n.* **रसास्वाद** (पु.), **रसग्रहण** (न.), **सौंदर्यग्रहण** (न.)
**apprehension,** *n.* **आकलन** (न.)
**approach,** *n.* १ **उपागम** (पु.) २ **दृष्टिकोन** (पु.)
**apriori, अनुभवपूर्व**

**apron stage,** अग्रमंच (पु.)
**arabesque,** *n.* अॅरबेस्क (मुख्यत्वेकरून वास्तु आदी कलाक्षेत्रातील शैलीदर्शक संज्ञा)
*cf.* baroque, बरोक
chiaroscuro, किआरोस्क्युरो
rococo, रकोको
**arbitrariness,** *n.* स्वेच्छता (स्त्री.)
**arbitrary,** *adj.* स्वेच्छ
**archaism,** *n.* आर्ष प्रयोग (पु.)
**archetypal criticism,** आदिमरूपनिष्ठ समीक्षा (*see* criticism)
**archetypal image,** आदिमरूप प्रतिमा (*see* image)
**archetypal text,** आदिमरूप संहिता
**archetype,** *n.* १ आदिमरूप (न.), मूलकल्प (न.) *cf.* prototype २ आदिमप्रत (स्त्री.)
**architectonic,** *adj.* संरचनानिष्ठ
**architectonics,** *n.* संरचनातंत्र (न.)
**architectural setting,** वास्तुरूप दृश्यविन्यास
**arena stage,** अरीना नाट्यगृह, मध्यमंच नाट्यगृह
**argument,** *n.* १ कथानकसार (न.) *cf.* abridgment २ युक्तिवाद (पु.)
**arrangement,** *n.* मांडणी (स्त्री.), रचना (स्त्री.)
**art,** *n.* कला (स्त्री.)
abstract art, १ अमूर्त कला २ अप्रतिरूप कला
conscious art, सबोध कला
dramatic art, नाट्य कला
fine art, ललित कला
folk art, लोककला
graphic art, रेखांकनकला
histrionic art, अभिनयकला
imitative art = mimetic art, १ अनुकृतिकला २ अनुकृतिशील कला, अनुकृतिनिष्ठ कला
performing art, प्रयोगनिष्ठ कला
plastic art, रूपाश्रयी कला
pure art, विशुद्ध कला
representational art, प्रतिरूपात्मक कला
symbolic art, प्रतीकात्मक कला
unconscious art, अबोधपूर्व कला
visual art, दृश्य कला
**art ballad,** (*also* literary ballad) विदग्ध पोवाडा (*see* ballad)
**artefact,** *n.* (*also* artifact) मानवनिर्मित वस्तु (स्त्री.)
**art epic,** (*also* classical epic ; literary epic) विदग्ध महाकाव्य, अभिजात महाकाव्य (*see* epic)
**art film,** कलाप्रधान चित्रपट
**art for art's sake,** कलेसाठी कला
**art-form,** *n.* १ कलारूप (न.) (*see* form) २ कलाप्रकार (पु.)
**article,** *n.* १ लेख (पु.) २ अग्रलेख (पु.)
**articulate,** *adj.* १ सुव्यक्त २ अभिव्यक्तिकुशल *v.t. & i.* सुव्यक्त करणे, सुव्यक्त होणे
**articulation,** *n.* सुव्यक्तीकरण (न.)
**artifact,** *n.* (*also* artefact) मानवनिर्मित वस्तु (स्त्री.)
**artificer,** *n.* कल्पक कारागीर (पु.)
**artificial style,** कृत्रिम शैली (*see* style)
**artisan,** *n.* कुशल कारागीर (पु.)
**artist,** *n.* कलावंत (पु.), कलाकार (पु.)
**artiste,** *n.* कलाकार (पु.) (रंगभूमी/चित्रपट क्षेत्रातील)
**artistic creation,** कलात्मक सर्जन, कलात्मक निर्मिती
**artistic inevitability,** कलात्मक अपरिहार्यता
**artistic insight,** कला-मर्मदृष्टी (स्त्री.)
**artistic intensity,** कलात्मक उत्कटता
**artistic layout,** कलात्मक मांडणी
**artistic merit,** कलात्मक गुणवत्ता
**artistic problem,** कला समस्या
**artistic quality,** कलागुण (पु.)
**artistic temperament,** कलात्मक मनोवृत्ती
**artistic work,** कलाकृती (स्त्री.)

**artist's vision,** कलावंताची प्रातिभ दृष्टी (*see* vision)
**art of illustration,** रेखाटन कला, प्रसंग चित्रणकला
**art technique,** कलातंत्र (न.)
**art theatre,** कलाप्रधान रंगभूमी (*see* theatre)
**aside,** *n.* एकीकडे (न.), अपवारित (न.)
*cf.* monologue, एकोक्ती, एकभाषित
soliloquy, स्वगत
**association,** *n.* संलगीकरण (न.), साहचर्य (न.)
**associational word,** साहचर्यात्मक शब्द
**association of events,** घटनासाहचर्य (न.)
**association of ideas,** १ कल्पनासाहचर्य (न.) २ विचारसाहचर्य (न.)
(as in : free association of ideas, १ मुक्त कल्पनासाहचर्य २ मुक्त विचारसाहचर्य)
**associative process,** साहचर्यप्रक्रिया (स्त्री.)
**assonance,** *n.* स्वरावृत्ती (स्त्री), स्वरसंवाद (पु.)
**assumption,** *n.* गृहीतक (न.)
*cf.* axiom, स्वयंसिद्धक, मूलाधारवचन
hypothesis, अभ्युपगम, गृहीत कृत्य
**asymmetrical,** *adj.* असममित
**asymmetry,** *n.* असममिती (स्त्री.)
**asynchronism,** *n.* असमकालता (स्त्री.)
**asyntactic,** *adj.* अनियत वाक्यरचनात्मक (शैली)
**atheism,** *n.* निरीश्वरवाद (पु.), नास्तिवाद (पु.)
**atmosphere,** *n.* वातावरण (न.)
**attitude,** *n.* १ वृत्ती (स्त्री.) २ दृष्टिकोन (पु.)
**attribute,** *n.* गुणविशेष (पु.)
**attributive,** *adj.* गुणवाचक
**auditorium,** *n.* प्रेक्षागृह (न.), प्रेक्षागार (न.)
**auditory image,** नादप्रतिमा (स्त्री.) (*see* image)
**auditory language,** श्राव्य भाषा
**auditory memory,** नादस्मृती (स्त्री.) (*see* memory)
**auditory pattern,** नादाकृती (स्त्री.)
**auditory sensation,** श्रुतिसंवेदना (स्त्री.)
**authentic,** *adj.* अस्सल, अधिकृत
**authenticity,** *n.* अस्सलपणा (पु.), अधिकृतता (स्त्री.)
**author,** *n.* ग्रंथकार (पु.), लेखक (पु.)
**author-craft,** *n.* लेखनकला (स्त्री.)
**authorised version,** प्रमाणित पाठ, अधिकृत पाठ
**authority,** *n.* १ प्रमाण (न.)
२ अधिकारी व्यक्ती (स्त्री.)
३ प्रमाण ग्रंथ (पु.)
**autobiography,** *n.* आत्मवृत्त (न.), आत्मचरित्र (न.)
**autograph,** *n.* १ स्वहस्तलेख (पु.)
२ स्वाक्षरी (स्त्री.)
**automatic writing,** असंज्ञलेखन (न.)
**autotelic,** *adj.* स्वयंप्रयोजननिष्ठ
**avant-garde,** *n.* अग्रगामी (पु.)
*adj.* अग्रगामी
**awe,** *n.* आदरयुक्त भीती (स्त्री.)
*cf.* fear, भीती
fury, कोप
horror, भय
**axiology,** *n.* मूल्यशास्त्र (न.)
**axiom,** *n.* स्वयंसिद्धक (पु.), मूलाधारवचन (न.) *cf.* assumption

# B

**background music,** पार्श्वसंगीत (न.)
**balance,** *n.* समतोल (पु.), संतुलन (न.)
**ballad,** *n.* पोवाडा (पु.)
art ballad = literary ballad, विदग्ध पोवाडा
historical ballad, ऐतिहासिक पोवाडा
**ballet,** *n.* नृत्यनाट्य (न.)
**barbarism,** *n.* अडाणी वाक्प्रयोग (पु.)
**bard,** *n.* शाहीर (पु.), भाट (पु.), चारण (पु.)
**bardic poetry,** शाहिरी काव्य, चारणकाव्य (न.) (*see* poetry)

**baroque,** *n.* बरोक (मुख्यत्वेकरून वास्तु आदी कलाक्षेत्रातील शैलीदर्शक संज्ञा) *cf.* arabesque
**basic text,** मूल संहिता, मूल पाठ
**bas-relief,** *n.* अल्प उठाव (पु.)
**bathos,** *n.* १ अतिरिक्त भावविवशता (स्त्री.) २ अकल्पित अवकर्ष (पु.)
**beat,** *n.* (छंदशास्त्र) दोलाघात (पु.)
**beat generation,** बीट पिढी (दुसऱ्या महायुद्धानंतरची प्रस्थापितविरोधी चळवळ किंवा पिढी)
**beatnik,** *n.* बीटनिक (पु.)
**beautiful,** *adj.* सुंदर *cf.* agreeable
**beauty,** *n.* सौंदर्य (न.)
absolute beauty, केवल सौंदर्य
dependent beauty, परायत्त सौंदर्य
free beauty, स्वायत्त सौंदर्य
**begging the question,** (*also* **petitio principii**) अन्योन्याश्रयदोष (पु.)
**belles-lettres,** *n.* ललित लेखन (न.)
**benediction,** *n.* आशीर्वचन (न.), स्वस्तिवचन (न.)
**bestiary,** *n.* बोधपर प्राणिकथा (स्त्री.)
**bibelot,** *n.* गुटका (पु.)
**biblioclasm,** *n.* ग्रंथभंजन (न.)
**biblioclast,** *n.* ग्रंथभंजक (पु.)
**bibliography,** *n.* १ संदर्भग्रंथसूची (स्त्री.) २ ग्रंथसूची (स्त्री.) ३ ग्रंथवर्णनशास्त्र (न.)
**bibliolatry,** *n.* पोथीनिष्ठा (स्त्री.)
**bibliomania,** *n.* ग्रंथसंग्रह वेड (न.)
**bibliophile,** *n.* ग्रंथवेडा (पु.)
**bimonthly,** *n.* द्वैमासिक (न.)
**biographical criticism,** चरित्रात्मक समीक्षा (*see* criticism)
**biographical evidence,** चरित्रात्मक पुरावा
**biographical note,** चरित्रात्मक टिपण
**biographical novel,** चरित्रात्मक कादंबरी (*see* novel)
**biography,** *n.* चरित्र (न.)
**bipolarity,** *n.* द्विध्रुवात्मकता (स्त्री.)
**biweekly,** *n.* द्विसाप्ताहिक (न.)
**black comedy,** (*also* **dark comedy**) १ विषण्ण सुखात्मिका २ विषण्ण सुखांतिका
**blank verse,** निर्यमक पद्य (*see* verse)
**blurb,** *n.* वेष्टनलेख (पु.)
**bohemian,** *n.* कलंदर (पु.)
**bombast,** *n.* शब्दावडंबर (न.)
**bon mot,** *n.* (*also* **epigram**) चाटूक्ती (स्त्री.)
**book,** *n.* पुस्तक (न.), पुस्तिका (स्त्री.)
*cf.* booklet, पुस्तिका
brochure, लघुपुस्तक
guide-book, मार्गदर्शिका
handbook = handlist, १ निर्देश पुस्तक २ मार्गदर्शिका
pamphlet, पुस्तपत्रक
**bookish,** *adj.* पुस्तकी
**booklet,** *n.* पुस्तिका (स्त्री.) *cf.* book
**book review,** पुस्तक परीक्षण (न.)
**bourgeois,** *n.* मध्यमवर्ग (पु.), पांढरपेशा (पु.), भांडवलदार (पु.), बूर्झ्वा (पु.)
*adj.* मध्यमवर्गीय, पांढरपेशीय, भांडवलदारी
**bowdlerization,** *n.* (*also* **bowdlerizing**) सोवळीकरण (न.)
**box set,** बॉक्स सेट, घराचा देखावा
**breast symbol,** वक्ष प्रतीक (न.) (*see* symbol)
**broadcast drama,** (*also* **radio drama; radio play**) नभोनाट्य (न.), श्रुतिका (स्त्री.)
**broadside,** *n.* शिवराळ सरबत्ती (स्त्री.)
**brochure,** *n.* लघुपुस्तक (न.) *cf.* book
**bucolic,** *adj.* जानपद
**buffoon,** *n.* विदूषक (पु.)
**burden of the song,** (*also* **refrain**) ध्रुवपद (न.), पालुपद (न.), अक्कडकडवे (न.)
**burlesque,** *n.* १ कृतिविडंबन (न.) २ वृत्तिविडंबन (न.)
**burletta,** *n.* संगीत प्रहसन (न.)

# C

*cacoethes scribendi*, **लेखनकंडू** (पु.)
**cacography,** *n.* १ **अशुद्ध लेखन** (न.) २ **असुंदर लेखन** (न.)
**cacology,** *n.* १ **सदोष शब्दयोजना** (स्त्री.) २ **उच्चारदोष** (पु.)
**cacophemism,** *n.* **कठोरोक्ती** (स्त्री.) (*opp.* euphemism) सौम्योक्ती
**cacophony,** *n.* **कर्णकटुत्व** (न.)
**cacozelia,** *n.* १ **अत्यलंकरण** (न.) २ **अतिसरलीकरण** (न.)
**cadence,** *n.* **नादांदोलन** (न.)
**caesura,** *n.* (*also* cesura) **यती** (पु.)
**calligrapher,** *n.* **सुलेखनकार** (पु.)
**calligraphy,** *n.* **सुलेखन कला** (स्त्री.)
**cameo,** *n.* **लघु-व्यक्तिरेखा** (स्त्री.)
**canon,** *n.* **प्रमाणसूत्र** (न.), **तत्त्व** (न.)
**cant,** *n.* १ **वर्गबोली** (स्त्री.) २ **दंभोक्ती** (स्त्री.)
**canto,** *n.* **सर्ग** (पु.)
**capsule play,** **संपुटनाटक** (न.) (*see* Play)
**caption,** *n.* **शीर्षक** (न.), **मथळा** (पु.)
**caricature,** *n.* **रूपविडंबन** (न.) (*see* comic)
**carmen figuratum,** (*also* altar poem *or* pattern poem) **चित्रकाव्य** (न.)
**carol** *n.* **उत्सवगीत** (न.) (मुख्यत: नाताळात म्हटली जाणारी गाणी)
**cartoon,** *n.* १ **व्यंगचित्र** (न.) २ **हास्यचित्र** (न.)
**cast,** *n.* **पात्रयोजना** (स्त्री.)
**castration complex,** **खच्चीकरणगंड** (पु.) (*see* complex)
**catabasis,** *n.* (*also* anticlimax) **अकल्पित अवकर्ष** (पु.) *cf.* climax (शोकात्मिका)
**catachresis,** *n.* **अपप्रयोग** (पु.)
**catalectic,** *adj.* **न्यूनाक्षर** (चरण)
**catalogue,** *n.* **सूची** (स्त्री.), **तालिका** (स्त्री.)
**catastasis,** *n.* १ **गर्भसंधी** (पु.) २ **शोकांतोन्मुख अवस्था** (स्त्री.)
**catastrophe,** *n.* (*also* solution) १ **निर्वहण** (न.) २ **दारुण अंत** (पु.) *cf.* climax (शोकांतिका)
**catchphrase,** *n.* **टाळीचे वाक्य** (न.)
**catchword,** *n.* १ **खुणेचा शब्द** (पु.) (मुद्रण) २ **घोषशब्द** (पु.)
**category difference,** **कोटिभेद** (पु.)
**category mistake,** **कोटिप्रमाद** (पु.)
**catharsis,** *n.* (*also* katharsis) **कथार्सिस** (पु.)
**cause,** *n.* **कारण** (न.)
**censor,** *n.* **अभ्यवेक्षक** (पु.)
**censorship,** *n.* **अभ्यवेक्षण** (न.)
**cesura,** (*also* caesura) **यती** (पु.)
**chain story,** **मालाकथा** (स्त्री.)
**chain verse,** (*also* concatenation) **शृंखलापद्य** (न.), **दामपदी** (स्त्री.) (*see* verse)
**chant,** *n.* **स्तोत्र** (न.)
**chantey,** *n.* (*also* chanty *or* shantey *or* shanty) **नाविकगीत** (न.)
**chapter,** *n.* **प्रकरण** (न.), **अध्याय** (पु.)
*cf.* paragraph, परिच्छेद
section, विभाग
sub-section, पोटविभाग
**character,** *n.* १ **पात्र** (न.), **भूमिका** (स्त्री.) २ **व्यक्तिरेखा** (स्त्री.)
flat character, एकपदरी व्यक्तिरेखा
round character, अनेकपदरी व्यक्तिरेखा
stereotype character = stock character, साचेबंद व्यक्तिरेखा
type character, नमुना व्यक्तिरेखा, वर्गदर्शक व्यक्तिरेखा
**character actor,** **विशेष भूमिका अभिनेता**
**character actress,** **विशेष भूमिका अभिनेत्री**
**characterization,** *n.* **स्वभावचित्रण** (न.), **व्यक्तिचित्रण** (न.), **स्वभावरेखन** (न.)
**characteristic,** *n.* **लक्षण,** (न.), **वैशिष्ट्य** (न.)

**character-sketch,** *n.* स्वभावचित्र (न.), व्यक्तिचित्र (न.)
**charm,** *n.* मोहकता (स्त्री.)
**charming,** *adj.* मोहक *cf.* agreeable
**chiaroscuro,** *n.* किआरोस्क्युरो (पु.) (मुख्यत्वेकरून वास्तु आदी कलाक्षेत्रातील शैलीदर्शक संज्ञा) *cf.* arabesque
**children's theatre,** बालरंगभूमी (स्त्री.) (*see* theatre)
**chimerical,** *adj.* (*also* chimeric) अतिकल्पित
**choral lyric,** समूहगीत (न.), वृंदगीत (न.)
**choreography,** *n.* नृत्यसंयोजन (न.)
**chorus,** *n.* १ वृंद (पु.) २ वृंदगान (न.)
**chronicle,** *n.* (*also* annals) बखर (स्त्री.), तवारिख (स्त्री.)
**chronicle play,** बखर नाटक (न.) (*see* play)
**chronography** *n.* (*also* chronographia) वर्तमानीकरण (न.)
**chronological development,** कालक्रमानुसारी विकास
**circular plot,** चक्रावर्ती कथानक, चक्रावर्ती संविधानक
**circumlocution,** *n.* (*also* periphrasis) शब्दघोळ (पु.)
**civilization,** *n.* नागरता (स्त्री.), संस्कृती (स्त्री.) *cf.* culture
**clarity,** *n.* सुस्पष्टता (स्त्री.), प्रसाद (पु.)
**classic,** *adj.* अभिजात
*n.* अभिजात कृती (स्त्री.)
**classical,** *adj.* अभिजात
**classical epic,** (*also* art epic *or* literary epic) विदग्ध महाकाव्य, अभिजात महाकाव्य (*see* epic)
**classicism,** *n.* अभिजाततावाद (पु.)
**classicist,** *n.* अभिजाततावादी (पु.)
**classification,** *n.* वर्गीकरण (न.)
**cliche,** *n.* पिष्टोक्ती (स्त्री.)
**climax,** *n.* उत्कर्षसीमा (स्त्री.) (शोकात्मिका)
*cf.* anagnorisis, अभिज्ञान.
anti-climax, अकल्पित अवकर्ष
catastrophe, १ निर्वहण २ दारुण अंत
crisis, संघर्षसीमा
denouement, उकल
peripeteia परावृत्ती
**closed couplet,** स्वयंपूर्ण द्विपदी
**closet drama,** पठनार्थ नाटक (*see* drama)
**clown,** *n.* विदूषक (पु.)
**cognition,** *n.* बोध (पु.), बोधन (न.), ज्ञान (न.)
**cognitive judgement,** ज्ञानविधान (न.) (*see* judgement)
**cognitive meaning** ज्ञानात्मक अर्थ
**cognitivism,** *n.* ज्ञानात्मकतावाद (पु.)
**cognitivist,** *n.* ज्ञानात्मकतावादी (पु.)
**coherence,** *n.* सुसंगती (स्त्री.), संबद्धता (स्त्री.)
**collaboration,** *n.* १ सहलेखन (न.) २ सहकार्य (न.)
**collaborator,** *n.* १ सहलेखक (पु.) २ सहकारी (पु.)
**collation,** *n.* १ पाठसंकलन (न.) २ पाठतुलन (न.) ३ पाठशोधन (न.)
**collator,** *n.* १ पाठसंकलन (पु.) २ पाठशोधक (पु.)
**collective conscious,** १ समूहबोध (पु.) २ वांशिक बोध
**collective mind,** (*also* group mind) १ समूहमन (न.) २ वांशिक मन
**collective unconscious,** वांशिक नेणीव, वांशिक अबोध मन
**colloquialism,** *n.* बोलभाषाप्रयोग (पु.)
**colloquial language,** बोलभाषा (स्त्री.)
**colophon,** *n.* १ पुष्पिका (स्त्री.) २ बोधचिन्ह (न.) ३ समाप्तिलेख (पु.)
**colour image,** रंगप्रतिमा (स्त्री.) (*see* image)

**combined image,** संयुक्त प्रतिमा (*see* image)
**comedian,** *n.* १ विनोदी नट (पु.) २ विनोदी लेखक (पु.)
**comedienne,** *n.* विनोदी नटी (स्त्री.)
**comedy,** *n.* १ सुखात्मिका (स्त्री.) २ सुखांतिका (स्त्री.)
black comedy, (*also* dark comedy) १ विषण्ण सुखात्मिका २ विषण्ण सुखांतिका
high comedy, १ विचारगर्भ सुखात्मिका २ विचारगर्भ सुखांतिका
low comedy, १ ढोबळ सुखात्मिका २ ढोबळ सुखांतिका
musical comedy, १ संगीत सुखात्मिका २ संगीत सुखांतिका
pure comedy, १ विशुद्ध सुखात्मिका २ विशुद्ध सुखांतिका
realistic comedy, १ वास्तवनिष्ठ सुखात्मिका २ वास्तवनिष्ठ सुखांतिका
romantic comedy, १ प्रणयरम्य सुखात्मिका २ प्रणयरम्य सुखांतिका
satiric comedy, १ उपहासप्रधान सुखात्मिका २ उपहासप्रधान सुखांतिका
sentimental comedy, १ भावविवश सुखात्मिका २ भावविवश सुखांतिका
tragi-comedy, १ शोकमिश्र सुखात्मिका २ शोकमिश्र सुखांतिका
**comedy of character,** १ स्वभावप्रधान सुखात्मिका २ स्वभावप्रधान सुखांतिका
**comedy of humours,** १ विकारप्रधान सुखात्मिका २ विकारप्रधान सुखांतिका
**comedy of intrigue,** १ कारस्थानप्रधान सुखात्मिका २ कारस्थानप्रधान सुखांतिका
**comedy of manners,** (*also* **comedy of wit**) १ आचारविडंबक सुखात्मिका २ आचारविडंबक सुखांतिका
**comedy of situation,** १ प्रसंगनिष्ठ सुखात्मिका २ प्रसंगनिष्ठ सुखांतिका
**comedy of wit,** (*also* **comedy of manners**) १ आचारविडंबक सुखात्मिका २ आचारविडंबक सुखांतिका
**comic,** *adj.* हास्यकारक (लेखन इत्यादी)
*n.* (The Comic) हास्यतत्त्व (न.)
burlesque, १ कृतिविडंबन २ वृत्तिविडंबन
caricature, रूपविडंबन
humour, विनोद
irony, १ उपरोध २ छद्म
lampoon, निंदाहेतुक व्यक्तिविडंबन
limeric, वात्रटिका, निरर्थिका
parody, १ शैली विडंबन २ विडंबन
pastiche, विडंबक लेखनकथा
pun, १ शब्दश्लेष २ शाब्दिक कोटी
repartee, १ प्रतिकोटी २ हजरजबाब
sarcasm, १ टोमणा २ मर्मभेदक (लेखन इ.)
sardonic, तिरस्कारयुक्त (लेखन इ.)
satire, १ उपहास २ उपहासिका
travesty, गांभीर्यविडंबन
wit, कोटी
**comic relief,** (*also* **relief**) १ ताणपरिहार (पु.) २ उठाव (पु.)
**comics,** *n. pl.* चित्रकथामाला (स्त्री.)
**commedia dell'arte,** उत्स्फूर्त सुखात्मिका, समयस्फूर्त सुखात्मिका
**commentary,** *n.* १ टीका (स्त्री.), भाष्य (न.) २ धावते वर्णन (न.), धावते समालोचन (न.)
**commentator,** *n.* टीकाकार (पु.), भाष्यकार (पु.)
**commitment,** *n.* बांधिलकी (स्त्री.)
**communicability,** *n.* निवेदनीयता (स्त्री.), निवेद्यता (स्त्री.)
**communication,** *n.* १ निवेदन (न.) २ संवाद (पु.)
**communicative ability,** निवेदनक्षमता (स्त्री.)

**comparative criticism,** तौलनिक समीक्षा (*see* criticism)

**comparative literature,** तौलनिक साहित्याभ्यास

**compendium,** *n.* ग्रंथसार (न.), ग्रंथसंक्षेप (पु.) *cf.* abridgment

**compere,** *v.t.* कार्यक्रमाचे संचलन करणे *n.* कार्यक्रम-संचालक (पु.)

**complex,** *n.* मनोगंड (पु.), गंड (पु.)
castration complex, खच्चीकरणगंड
electra complex, इलेक्ट्रा गंड, पितृगंड
Oedipus complex, इडिपस गंड, मातृगंड
orestes complex, ऑरेस्टिज गंड, मातृवध गंड
*adj.* व्यामिश्र

**complex plot,** व्यामिश्र संविधानक

**complication,** *n.* गुंतागुंत (स्त्री.)

**composition,** *n.* १ रचना (स्त्री.) २ निबंधन (न.)

**comprehend,** *v.t.* समाकलन करणे

**comprehension,** *n.* समाकलन (न.)

**concatenation,** *n.* (*also* chain verse) शृंखला-पद्य (न.), दामपदी (स्त्री.)

**conceit,** *n.* दूरान्वित कल्पना (स्त्री.)

**concept,** *n.* संकल्पना (स्त्री.)

**conception,** *n.* संकल्पन (न.)

**conclusion,** *n.* निष्कर्ष (पु.)

**concordance,** *n.* १ शब्दसंदर्भसूची (स्त्री.) २ पदकोश (पु.)

**concrete,** *adj.* मूर्त

**concrete universal,** विशेष संपृक्त सामान्य, मूर्त सामान्य

**condensation,** *n.* संक्षेपण (न.)

**confession,** *n.* आत्मनिवेदन (न.)

**configuration,** *n.* १ संरूपण (न.) २ रूपविधान (न.)

**conflict,** *n.* संघर्ष (पु.)

**conformist,** *n.* परंपरानिष्ठ (पु.)

**connoisseur,** *n.* १ कलाभिज्ञ (पु.) २ दर्दी (पु.)

**connotation,** *n.* १ लक्ष्यार्थ (पु.) २ गुणवाचक अर्थ (पु.)
*cf.* denotation, १ वाच्यार्थ २ वस्तुवाचक अर्थ

**conscious,** *n.* सबोध (न.)
*cf.* preconscious, बोधपूर्व
subconscious, अवबोध
super-conscious, अतिबोध
supra-conscious, पराबोध
unconscious, अबोध

**conscious art,** सबोध कला (*see* art)

**consciousness,** *n.* जाणीव (स्त्री.)

**consonance,** *n.* १ वर्णावृत्ती (स्त्री.) २ संवाद (पु.)

**conspectus,** *n.* १ सारदर्शन (न.) २ परिदर्शन (न.)

**construct,** *n.* कल्प (पु.)

**construction,** *n.* बांधणी (स्त्री.)

**constructivism,** *n.* अप्रतिरूपतावाद (पु.)

**constructivist, setting,** अप्रतिरूप नेपथ्य

**contemplation,** *n.* १ चिंतन (न.) २ तटस्थ सौंदर्यचिंतन (न.)

**contemplative attitude,** १ चिंतनशील वृत्ती २ तटस्थ सौंदर्यचिंतनशील वृत्ती

**contemplative faculty,** चिंतनशक्ती (स्त्री.)

**contemporaneity,** *n.* समकालीनता (स्त्री.)

**contemporary,** *adj.* समकालीन *cf.* ancient

**content,** *n.* आशय (पु.)

**content analysis,** १ आशयविश्लेषण (न.) २ विषयविश्लेषण (न.) (*see* analysis)

**content element,** आशय-घटक (पु.)

**contents,** *n. pl.* अनुक्रम (पु.), विषयानुक्रमणिका (स्त्री.), अनुक्रमणिका (स्त्री.)
*cf.* acknowledgment

**context,** *n.* संदर्भ (पु.)

**contraction,** *n.* अक्षरलोप (पु.)

**contrast,** *n.* **विरोध** (पु.)
**controversialist,** *n.* **वादप्रिय** (पु.)
**conundrum,** *n.* (*also* **puzzle; riddle**) **कूट** (न.), **कोडे** (न.), **उखाणा** (पु.)
**convention,** *n.* **संकेत** (पु.)
academic conveention, पंडिती संकेत
dramatic convention, नाट्यसंकेत
epic convention, महाकाव्यसंकेत
poetic convention, काव्यसंकेत, कविसंकेत
**conventional definition, रूढ व्याख्या** (*see* definition)
**conversation piece, संवादरूप लेखन**
**conversialist,** *n.* **१ वादपटु** (पु.) **२ वादकर्ता** (पु.)
**convincing,** *adj.* **पटण्यासारखे, प्रत्ययकारक**
**copy,** *n.* **प्रत** (स्त्री.)
**copyright,** *n.* **स्वामित्वाधिकार** (पु.)
**corpus,** *n.* **लेखनसंभार** (पु.)
**corrupt reading,** **अपपाठ** (पु.), **भ्रष्ट पाठ**
**corrupt text, भ्रष्ट संहिता**
**cosmic irony,** (*also* **irony of fate**) **दैवदुर्विपाक** (पु.), **नियतीचा उपरोध**
**cosmopolitan,** *adj.* **सार्वदेशिक**
**costume,** *n.* **वेषभूषा** (स्त्री.)
**costume drama, वेषभूषाप्रधान नाटक**
**coterie,** *n.* **गट** (पु.), **कंपू** (पु.)
**couplet,** *n.* **द्विपदी** (स्त्री.)
**courtesy book,** (*also* **etiquette book**) **शिष्टाचार-पुस्तिका** (स्त्री.)
**court poet,** (*also* **poet laureate**) **राज-कवी** (पु.)
**cradle books,** *n. pl.* **दोलामुद्रिते** (न.अ.व.)
**craft** *n.* **कारागिरी** (स्त्री.)
**craftman,** *n.* **कारागीर** (पु.)
**crasis,** *n.* **अक्षरलोप** (पु.)
**creation,** *n.* **सर्जन** (न.), **निर्मिती** (स्त्री.)
**creative artist, सर्जनशील कलावंत**
**creative criticism, सर्जनशील समीक्षा** (*see* criticism)
**creative imagination, सर्जनशील कल्पनाशक्ती, प्रतिभा** (स्त्री.) (*see* imagination)
**creative writing, सर्जनशील लेखन**
**credit,** *n.* **श्रेयनिर्देश** (पु.) *cf.* acknowledgment
**credit title, श्रेयनामावली** (स्त्री.)
**crisis,** *n.* **संघर्षसीमा** (स्त्री.) (शोकात्मिका) *cf.* climax
**criterion,** *n.* **कसोटी** (स्त्री.), **निकष** (पु.)
**critic,** *n.* **समीक्षक** (पु.), **टीकाकार** (पु.)
**critical absolutism, समीक्षेतील केवलवाद**
**critical appraisement, चिकित्सक मूल्यमापन**
**critical classification, चिकित्सक वर्गीकरण**
**critical comparison, चिकित्सक तुलना**
**critical edition, चिकित्सक आवृत्ती** (*see* edition)
**critical recension,** (*also* **recension**) **१ संहिताशाखा** (स्त्री.) **२ संशोधित पाठ**
**critical relativism, समीक्षेतील सापेक्षतावाद**
**criticism,** *n.* **१ साहित्य-विचार** (पु.) **२ समीक्षा** (स्त्री.), **समीक्षा-विचार** (पु.), **टीकाशास्त्र** (न.) **३ टीका** (स्त्री.), **समी-क्षण** (न.)
*cf. critique* समालोचना, मीमांसा
*notice*, परीक्षण
*opinion*, अभिप्राय
*review*, १ परीक्षण २ समालोचन ३ आढावा
absolutist criticism, केवलमूल्यनिष्ठ समीक्षा
analytical criticism, विश्लेषणात्मक समीक्षा
applied criticism, १ उपयोजित समीक्षा २ उपपत्तिनिष्ठ समीक्षा
archetypal criticism, आदिमरूपनिष्ठ समीक्षा
biographical criticism, चरित्रात्मक समीक्षा
comparative criticism, तौलनिक समीक्षा
creative criticism, सर्जनशील समीक्षा

evaluative criticism, मूल्यमापनात्मक समीक्षा
formal criticism, १ रूपनिष्ठ समीक्षा २ साहित्यप्रकारनिष्ठ समीक्षा
formalistic criticism, रूपवादी समीक्षा, आकृतिवादी समीक्षा
Freudian criticism, फ्राइडवादी समीक्षा
historical criticism, इतिहासनिष्ठ समीक्षा, ऐतिहासिक समीक्षा
impressionistic criticism, प्रत्ययनिष्ठ समीक्षा, संस्कारनिष्ठ समीक्षा
interpretative criticism, अर्थनिरूपणात्मक समीक्षा
judicial criticism, १ मूल्याधिष्ठित समीक्षा २ निर्णयात्मक समीक्षा, निर्णायक समीक्षा
Jungian criticism, युंगवादी समीक्षा
linguistic criticism, १ भाषा विज्ञाननिष्ठ समीक्षा २ भाषाविश्लेषणात्मक समीक्षा
literary criticism, साहित्य-समीक्षा
Marxist criticism, मार्क्सवादी समीक्षा, साम्यवादी समीक्षा
moral criticism, नीतिवादी समीक्षा
mythic criticism, आदिमकथानिष्ठ समीक्षा
normative criticism, प्रमाणकनिष्ठ समीक्षा
practical criticism, १ प्रयुक्त समीक्षा २ प्रात्यक्षिक समीक्षा
pragmatic criticism, परिणामवादी समीक्षा
psychoanalytic criticism, मनोविश्लेषणात्मक समीक्षा
relativistic criticism, सापेक्षतावादी समीक्षा
rhetorical criticism, अलंकारशास्त्रनिष्ठ समीक्षा
sociological criticism, १ समाजशास्त्रीय समीक्षा २ समाजसापेक्ष समीक्षा
subjective criticism, आत्मनिष्ठ समीक्षा, व्यक्तिनिष्ठ समीक्षा
theoretical criticism, सैद्धान्तिक समीक्षा

**critique,** *n.* **समालोचना** (स्त्री.), **मीमांसा** (स्त्री.) *cf.* criticism
**crossed rhyme, मध्य यमक**
**cross-reference,** *n.* **अन्योन्य संदर्भ** (पु.), **पूरक संदर्भ** (पु.)
**cruelty,** *n.* **क्रौर्य** (न.)
**cubism,** *n.* **घनवाद** (पु.), (कलाक्षेत्रातील संज्ञा) **क्युबिझम** (पु.)
**cue,** *n.* **संवादसूचना** (स्त्री.)
**culture,** *n.* **संस्कृती** (स्त्री.) *cf.* civilization, नागरता, संस्कृती
**cumulative story, संचयीकथा** (स्त्री), **परिवर्धिनी कथा**
**curtain,** *n.* **पडदा** (पु.)
**curtain raiser, पूर्वनाटिका** (स्त्री.), **जोड-नाटुकले** (न.)
**cycle,** *n.* **चक्र** (न.)
**cycle of poems, गाथाचक्र** (न.)
**cynicism,** *n.* **तुच्छतावाद** (पु.), **व्यर्थतावाद** (पु.)

# D

**Dadaism,** *n.* **दादावाद** (पु.), **दादाइझम** (पु.) (कलाक्षेत्रातील एक चळवळ)
**daily,** *n.* **दैनिक** (न.)
**dance-drama,** *n.* **नृत्यनाटक** (न.) (*see* drama)
**dark comedy,** (*also* black comedy), १ **विषण्ण सुखात्मिका** २ **विषण्ण सुखांतिका** (*see* comedy)
**dated style, कालबाह्य शैली** (*see* style)
**dead metaphor, लुप्तार्थ रूपक**
**death instinct, मृत्यूची सहजप्रवृत्ती, मुमूर्षा** (स्त्री.)

**decadence,** *n.* ऱ्हास (पु.), अवनती (स्त्री.)
**decadent,** *adj.* ऱ्हासदर्शक, अवनतिदर्शक
**decadent period,** ऱ्हासकाल (पु.), अवनतिकाल (पु.)
**decorum,** *n.* १ औचित्य (न.) २ आचार-सौष्ठव (न.)
**dedication,** *n.* अर्पण-पत्रिका (स्त्री.)
**deduction** *n.* निगमन (न.)
**deductive method,** निगमन-पद्धती (स्त्री.)
**define** *v.t.* व्याख्या करणे
**definition** *n.* व्याख्या (स्त्री.), लक्षण (न.)
analytical definition, विश्लेषणात्मक व्याख्या
conventional definition, रूढ व्याख्या
persuasive definition, अनुनयी व्याख्या
stipulative definition, संकेतजनक व्याख्या
**definitive edition** प्रमाणित आवृत्ती (*see* edition)
**dehumanisation** *n.* अमानवीकरण (न.)
**deism** *n.* विवेकनिष्ठ आस्तिक्यवाद (पु.)
**deitied object** दैवतीकृत वस्तु
**delight** *n.* आल्हाद (पु.)
*cf.* ecstasy, परमानंद, आनंदसमाधी
gratification, तृप्ती
joy, आनंद
pleasure, सुख
rapture, आनंदातिशय
satisfaction, समाधान
transport, अत्यानंद
**delineation** *n.* चित्रण (न.), आरेखन (न.)
**delocalization** *n.* स्थलातीत करणे (न.)
**delusion** *n.* भ्रांती (स्त्री.)
**demonic (demoniac) genius,** १ अमानुष प्रतिभा २ अमानुष प्रतिभावंत
**denotation** *n.* १ वाच्यार्थ (पु.) २ वस्तुवाचक अर्थ (पु.) *cf.* connotation, १ लक्ष्यार्थ २ गुणवाचक
**denouement** *n.* (*also* resolution) उकल (स्त्री.) (शोकांतिका) *cf.* climax
**dependent beauty,** परायत्त सौंदर्य (*see* beauty)
**depersonalization** *n.* व्यक्तित्वलोप (पु.), स्वत्वलोप (पु.)
**derivation** *n.* १ व्युत्पत्ती (स्त्री.) २ व्युत्पादन (न.)
**derivative,** *adj.* पराश्रयी, परोद्भव
**description,** *n.* वर्णन (न.)
**descriptive,** *adj.* वर्णनात्मक
**descriptive meaning,** वर्णनात्मक अर्थ
**descriptive poetry,** वर्णनात्मक काव्य (*see* poetry)
**descriptive term,** वर्णनात्मक पद
**design,** *n.* १ संकल्पचित्र (न.) २ चित्राकृती (स्त्री.)
*cf.* diagram, रेखाकृती
drawing, आरेखन
model, १ नमुना २ लघुप्रतिकृती
outline, रूपरेषा, आराखडा
pattern, आकृतिबंध
plan, मानचित्र
sketch, रेखाटन
**detached narrator,** (*also* uninvolved narrator) तटस्थ निवेदक
**detective novel,** गुप्तचर कादंबरी (*see* novel)
**detective story,** गुप्तचर कथा (*see* story)
**determinative judgement,** नियत निर्णय, नियत विधान (*see* judgement)
**determinism,** *n.* नियतीवाद (पु.), नियततावाद (पु.)
**deus-ex-machina,** *n.* (*also* God from the machine) १ दैवी हस्तक्षेप (पु.) २ योगायोगतंत्र (न.)
**deuteragonist,** *n.* उपनायक (पु.)
**development,** *n.* विकास (पु.)
**deviation,** *n.* मार्गांतरण (न.)
**device,** *n.* क्लृप्ती (स्त्री.), युक्ती (स्त्री.)
**devotional poetry,** भक्तिकाव्य (न.) (*see* poetry)

